**राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळाच्या प्रक्षेत्रांवर "नर मेंढे व बोकड संगोपन केंद्र स्थापन करणे" या प्रकल्पास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पविआ-२०१६/प्र.क्र.१७/पदुम-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १२ मे, २०१७

संदर्भ :-१.आयुक्त पशुसंवर्धन कार्यालयाचे क्र.एफवायपी-१२(१२)/सीआर-१०५८/२०१२, पसं-६, दि.३०.९.२०१५ चे पत्र.
२.कृषि व पदुम विभाग शा.नि.क्र.राकृवि ०४१६/प्र.क्र.४४/राकृवियो कक्ष, दि.१९.४.२०१७

प्रस्तावना :-

राज्यातील स्थानिक शेळ्या-मेंढ्याच्या गुणवत्तेत सुधारणा करून त्यांची उत्पादकता वाढवून कच्च्या व पक्क्या मालाला बाजारपेठ उपलब्ध करून देणे, तसेच त्यापासून मिळणाऱ्या उत्पन्नात वाढ करून हा व्यवसाय अधिक किफायतशीर होण्यासाठी सुधारीत जातीच्या शेळया-मेंढ्यांची पैदास पालकांच्या उत्पन्नात वाढ करणे हा आहे. त्यासाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळाच्या **पडेगाव (औरंगाबाद), बिलाखेड (जळगाव), पोहरा (अमरावती), महूद (सोलापूर), मुखेड (नांदेड), आंबेजोगाई (बीड), तीर्थ (उस्मानाबाद), दहिवडी (सातारा), रांजणी (सांगली), बोंद्री (नागपूर)** या प्रक्षेत्रांवर **"नर मेंढे व बोकड संगोपन केंद्र स्थापन करणे"** हा प्रकल्प राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीची २२ वी बैठक दि.२२ जानेवारी,२०१७ रोजी झाली. सदर बैठकीमध्ये पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळाच्या नियंत्रणाखालील **पडेगाव (औरंगाबाद), बिलाखेड(जळगाव),पोहरा (अमरावती), महूद (सोलापूर), मुखेड (नांदेड), आंबेजोगाई (बीड), तीर्थ (उस्मानाबाद), दहिवडी (सातारा), रांजणी (सांगली), बोंद्री (नागपूर)** या प्रक्षेत्रांवर **"नर मेंढे व बोकड संगोपन केंद्र स्थापन करणे"** या प्रकल्पास मान्यता प्रदान करण्यात आलेली आलेली आहे. त्याअनुषंगाने खालील शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

<u>शासन निर्णय :-</u>

३. राज्यातील स्थानिक शेळ्या-मेंढ्यांचे संवर्धन करून राज्यातील मांस व दूध उत्पादन वाढ करणे, यासाठी शेळी-मेंढी पालन व्यवस्थापनाबाबत शेळी-मेंढी पालकांमध्ये जागरूकता निर्माण करणे आणि उच्च प्रतीचे उस्मानाबादी, संगमनेरी व बेरारी जातीचे बोकड व डेक्कनी व माडग्याळ जातीचे नर मेढे उत्पादन करून ते शेतकरी/मेंढपाळांना शेळ्या-मेंढ्यांच्या प्रतीत व दर्जात वाढ करण्यासाठी पुरठा करणे, यासाठी

४. राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळाच्या अधिनस्त असलेल्या **पडेगाव (औरंगाबाद), बिलाखेड (जळगाव),पोहरा (अमरावती), महूद (सोलापूर), मुखेड (नांदेड),आंबेजोगाई (बीड), तीर्थ (उस्मानाबाद), दहिवडी (सातारा),रांजणी (सांगली), बोंद्री (नागपूर) या** प्रक्षेत्रांवर **"नर मेंढे व बोकड संगोपन केंद्राची"** स्थापना करणे व प्रक्षेत्रावर आवश्यक त्या मुलभूत सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी रू.१.०१ कोटी एवढी किंमत मंजूर केली असून त्यापैकी रू.०.५० कोटी एवढा निधी वितरीत केला आहे. सदरचा प्रकल्प सन २०१७-१८ या कालावधीमध्ये राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीने मान्यता प्रदान केल्यानुसार व उपलब्ध होणाऱ्या निधीच्या अधिन राहून राबविण्यात यावा.

५. सदर प्रकल्पाची अंमलबजावणी व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे यांच्यामार्फत करण्यात यावी. तसेच या प्रकल्पाचा खर्च करण्यासाठी व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. प्रकल्पाची अंमलबजावणी खालील सूचनांचे अधिन राहून करण्यात यावी.

(१) सदर प्रकल्पाचे संनियंत्रण अधिकारी आयुक्त पशुसवंर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-६७ हे असतील.

(२) या प्रकल्पांतर्गत उपलब्ध झालेला निधी व त्याचा विनियोग याबाबतचा हिशोब स्वतंत्रपणे विहित लेखा पध्दतीनुसार ठेवण्यात यावा.

(३) उपलब्ध करून देण्यात आलेला निधी विहित कालमर्यादेत १०० टक्के खर्ची करुन, त्याबाबतचे विहीत प्रपत्रातील उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त पशुसवंर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावे.

(४) सदरचा प्रकल्प राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या दि.२२.१.२०१७ रोजीच्या बैठकीतील निर्णय व राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन राबविण्यात यावा.

(५) या प्रकल्पाचा समावेश संबंधित जिल्ह्याच्या जिल्हा कृषि आराखड्यात (C-DAP) करण्यात येवून तसे राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष व पदुम-३ या कार्यासनास कळविण्यात यावे.

(६) केंद्र शासनाने विकसीत केलेल्या RDMIS या प्रणालीवर या प्रकल्पाची माहिती भरण्यात यावी.

(७) प्रकल्पाचा आर्थिक खर्चाचा आणि भौतीक साध्याचा मासिक प्रगती अहवाल नियमितपणे शासनास सादर करावा.

(८) प्रकल्प राबविताना त्याची अंमलबजावणी, सनियंत्रण आणि मूल्यमापन करणे याबाबत आवश्यक तो समन्वय अंमलबजावणी यंत्रणांनी आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याशी ठेवावा.

(९) सदर प्रकल्पाचा प्रगती अहवाल महामंडळाने आयुक्त पशुसंवर्धन महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत शासनास वेळोवेळी सादर करावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५१२१४४०५३९८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vikas Tulshiram Kadam

Digitally signed by Vikas Tulshiram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, cn=Vikas Tulshiram Kadam
Date: 2017.05.15 12:39:20 +05'30'

**( विकास तु. कदम )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. प्रधान सचिव (कृषि व फलोत्पादन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
२. आयुक्त पशुसंवर्धन,महाराष्ट्र राज्य, पुणे-६७.
३. आयुक्त (कृषि ), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे.
५. उपसचिव (राकृवियो कक्ष), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
६. महालेखापाल,मुंबई/नागपूर (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षण).
७. निवड नस्ती पदुम-३.